संचालक,महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक यांच्या आस्थापनेवर वित्तीय सल्लागार (महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील उपसंचालक दर्जाचा अधिकारी) व लेखाधिकारी (गट-अ) या अस्थायी पदास मुदतवाढ देणेबाबत.

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक : सीटीई-०२१९/प्र.क्र.३२/ पोल-३

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १७ मार्च, २०२५.

वाचा:-

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.अेपीओ-०२१६/प्र.क्र.६५/पोल-३, दि. ०२.०८.२०१८.

२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-०२१९/प्र.क्र.३२/पोल-३, दि.२०.०९.२०२४.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/ मुदतवाढ/संचालक/मपोअ/१२/२०१९, दि.१२.०२.२०२५

४) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५.

शासन निर्णय:-

संचालक, महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक या संस्थेला गृह विभाग, शासन निर्णय, दि.०५.०२.२०१६ अन्वये स्वायत्त संस्थेचा दर्जा दिला असून, ही संस्था पोलीस दलाचे शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून कार्यरत आहे. या कार्यालयातील लेखाविषयक बाबी काटेकोरपणे हाताळता याव्यात यासाठी संचालक, महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी यांच्या आस्थापेनवर वित्तीय सल्लागार व लेखा अधिकारी ही नवीन पदे उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दि.०२.०८.२०१८ व्दारे निर्माण करण्यात आलेली आहेत. नव्याने निर्माण केलेली २ पदे अस्थायी स्वरुपाची आहेत.

२. उक्त पदांना यापूर्वी संदर्भीय क्र.२ येथील दि.२०.०९.२०२४ च्या शासन निर्णयाव्दारे दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. उक्त पदे ज्या परिस्थितीत निर्माण करण्यात आली होती ती परिस्थिती अद्यापही कायम आहे. सदर पदांपैकी एकही पद सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाही. म्हणून संचालक, महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक यांच्या आस्थापनेवरील वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील उपसंचालक दर्जाचा अधिकारी व लेखाधिकारी(गट-अ) या पदांना दि.०१.०३.२०२५ पासून

मुदतवाढ मिळणेबाबत विनंती पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधिन क्र.३ येथे नमूद दिनांक १२.०२.२०२५ च्या पत्राव्दारे शासनास केली आहे.

३. म्हणून, संचालक, महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक यांच्या आस्थापनेवरील वित्तीय सल्लागार,महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील उपसंचालक दर्जाचा अधिकारी व लेखाधिकारी(गट-अ) या पदांना **दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत** खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त पदे वगळून उर्वरित पदांना मुदतवाढ देण्यात यावी. तसेच पदे ज्या कारणास्तव ज्या अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्याचे पालन करण्यात यावे.

४. उक्त खर्च गृह विभाग, मागणी क्र. "२०५५-पोलीस-(००)(१०९) जिल्हा पोलीस (००)(०१) जिल्हा पोलीस दत्तमत्त (२०५५०१६८)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो **सन २०२५-२६** या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक.,दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१७१७२११३३५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA TANAJI BHALWANE

Digitally signed by RAJENDRA TANAJI BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD514095659A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA TANAJI BHALWANE
Date: 2025.03.17 17:22:06 +05'30'

**( रा. ता. भालवणे )**
**उप सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
५. संचालक,महाराष्ट्र पोलीस प्रबोधिनी, नाशिक
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
७. गृह विभाग, कार्यासन (पोल-५अ).
८. वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.
९. निवड नस्ती (पोल-३).